शिस्त राखण्याचा अधिकार असलेली व्यक्ति; घराण्यांतील वडील माणूस. 'त्यांनीं माझा मुका घेण्यास तोंड पुढें केलेंच तर मी वडीलधारा न ओळखतां एकदम त्यांच्या मिशा उपटी.'–वहक-लेली तरुणी ६. ०परंपरा–स्त्री. पूर्वजांची, वडील माणसांची मालिका. ०परंपरागत–वि. पूर्वजांपासून चालत आलेली; पिढी-जात. ०मान–पु. वडीलकीचा मान; पिढीजाद हक्क. 'होळीपोळीचा वडीलमान मुकद्दमाकडे आहे.' वडलाई, वडलाबाई–स्त्री. आपल्या लहान भावंडांवर अधिकार गाजविणें (निंदार्थी उपयोग).

वडलांचा अडकित्ता–पु. (ल.) सुपारी फोडण्यास घेतलेले दगड.

वडलांचा आहणा–पु. जुनी म्हण. वडलावडली–वि. वाड-वडलांच्या वेळचें; परंपरागत; प्राचीन. –क्रिवि. वाडवडलापासुन; वंशपरंपरा. 'वडलावडली भार असे जन पडती।'–ऐपो २६९.

वडलोपार्जित, वडिलार्जित–वि. वाडवडलांनीं संपादिलेलें, ठेविलेलें (द्रव्य). [वडील + उपार्जित किंवा अर्जित] वड-लोबा–पु. आपल्या लहान भावंडांवर अधिकार गाजवणारा मुलगा; दादा. वडलोवडलीं–क्रिवि. वंशपरंपरागत. वडला-वडली पहा.

० वड्ववा–स्त्री. घोडी; वडवा पहा. 'तीये वड्ववेसी डसली।' –उषा १७०७.

वड्वसा–स्त्री. (माण.) इच्छा. (क्रि० धरणें).

वडें–वढें पहा.

वड्डर–स्त्रीपु. १ वडार जात. २ तींतील व्यक्ति. [का. ओड्ड] ०खोरें–न. खांदणें, माती भरणें, भराव घालणें वगैरे कामास उपयोगी असलेलें हत्यार.

वड्डी–स्त्री. (क.) चार चिंचोक्यांचा एक गट (मुलींच्या खेळांत रूढ). [का. ओड्ड=ढीग]

वढ, वढक, वढकर, वढगस्त, वढगस्ती, वढण, वढणवाकी, वढणें, वढदोरा, वढव, वढवणें, वढा, वढाताण, वढावढी, वढळकी, वढाळी, वढिस्त–ओढ, ओढक इ० पहा.

वढम–स्त्री. (व.) नाद; आवड. [ओढ]

वढरी–पु. (महानु.) प्रेतयात्रेंत भाग घेणारा; प्रेतावरोबर जाणारा मनुष्य. 'कंसाते नेत माडी सखिजन वढरी गूढरी घालु-नियां।'–गस्तो ३२.

वढाय–वि. (व.) उनाड; बदमाष.

वढाळ–न. ओढाळ गुरूं. ओढाळ पहा. 'वढाळें चरतीं शालीवनें।'–मुंमभा ३.७९.

वढी–स्त्री. (व.) शेतांत घातलेला लहानसा बांध.

वढील–वडील पहा. –मोउद्योग ८.४.

वढें–न. १ सूड; उट्टें. (क्रि० घेणें; उगवणें; काढणें).' पण मी आतांच ह्याचें वढें काढीन.'–वाल २.१५४. २ मोबदला; भरपाई. (क्रि० घेणें; काढणें). 'यंदा तो फसला तर ह्याचें वढें पुढल्या वर्षी कां घेईना?' [सं. वृध्?]

वढ्याळ–ओढाळ पहा.

वण–पुन. देवी, गळूं, क्षत इ० वरें झाल्यानंतर त्या जागे-वर राहणारें चिन्ह; डाग; व्रण; घट्टा. –मोरा १.४०२. 'नामचि पुरे न घ्यावे अष्टांगीं नमन करुन आठ वण।'–मो स्फुट आर्या (नवनीत पृ. २५५). [सं. व्रण; प्रा. वण]

वण–स्त्री. (राजा.) वेताळ, म्हसोवा इ० देवतांस जो जना-वरादि वलि देतात ती.

वण–न. (प्र.) वन पहा. 'तेव्हां तो भट एक वण मागें टाकतो तों दुसरें पुढें येतें.'–मसाप १.२. –स्त्री. वनचराई. पाहणी इ०च्या सरकारी कागदपत्रांतून म्हैस शब्दामागें याचा योग होतो (वनचराई आकारावयाची या अर्थानें). 'वण म्हशी चौदापैकीं मयत तीन वाकी जमा अकरा.' [सं. वन] ०मस–म्हैस–(वण + म्हैस) वनचराईचा आकार. 'हल्लीं वणमस (म्हशीमागें एक रुपाया...) भरूनसुद्धां श्रावणापासून जनावरें घरीं वांधून ठेविलीं आहेत.'–खेया. –वाडमा १.११२. वणीं देणें–(कों.) वनांत नेऊन मारणें. –लोक २.३१.

वणंग–गें–न. (गो.) एक लहान जातीचा मासा.

वणज–स्त्री. व्यापारासाठीं प्रवास, फेरी; वाणिज्य. [सं. वाणिज्य] वणजणें–अक्रि. व्यापार करणें.–ज्ञा १८.९४८ (पाठभेद)

वणजारा–री–पु. एक जात किंवा तींतील व्यक्ति; लमाण; हे लोक परगांवाहून धान्य, गुरें इ० आणून विकतात. 'मार्गी जाता अवधारा। भेटला सार्थक वणजारा।'–कथा १.९.१४९. [सं. वाणिज्यकार; फा. बिरंज=तांदूळ; फा. बिरिंजारी=धान्याचा व्यापारी] वणजार–रा–नपु १ वणजारी लोकांचा तळ, समुदाय. २ (समुच्चयार्थी) वणजारी.

वणत–स्त्री. (कारवारी) भिंत. –शर.

वणधा–स्त्री. (मुंबई, कों.) कोठें दुखत असलें म्हणजे सांध्यांत येणारी गांठ; अवधणा पहा.

वणवण–वणवणवाणा–णी–स्त्री. १ दमणूक; व्यर्थ श्रम; कुत्तेघाशी. २ भगभग; गांजणूक. 'श्रीरामाचें व्रतबंधन। सुखी केले अकिंचन। वणवण निमाली पूर्ण।'–भाराबाल ७.१५. –क्रिवि. १ पुष्कळ श्रम होत असें निरर्थकपणें (क्रि० करणें). २ उगाच पुष्कळ दमणूक करून. (क्रि० हिंडणें; फिरणें). 'उगेंच वणवण हिंडोन।'–दा १९.६.२४. वनवन पहा. वणवणणें–अक्रि. धडपड करणें; कष्ट करणें. 'जें चित्त वणवणी विषयालागीं।' –एभा २५.२४२. वणवणा–क्रिवि. वणवणचा अतिशय. 'सारा हिंदुस्थान वणवणा पायींच हिंडून पहावा'–खेया (प्रस्तावना).

**वणवणें-वणवा**—ओणवणें, ओणवा पहा. **वणवा येणें**-क्रि. (बे.) १ खांदा देणें. २ जनावरानें जूं काढल्यावर खालीं पडणें.

**वणवा**—पु. डोंगर, अरण्य इ०कांत पेटलेला अग्नि; दावानल; रानवा. -ज्ञा १४.१९१. 'यदुवंशाचीं वेळवनें वणवाचि असती।' -भाए ५३. [सं. वन; प्रा. वण. देप्रा. वगव=दावानल] **वणवणें**-अक्रि. वणव्यानें व्याप्त होणें. 'जैसा ग्रीष्म काळीं गिरिवरु। वणवला कां।' -ज्ञा २.७६.

**वणवी**—स्त्री. रास; गंज. 'जैसे तृणाचे वणवीसी। अग्निस्पर्शी होतां नाशी।' -गुच ३६.२३८.

**वणसावणें**—न. (मुंबई, कों.) स्वप्नांतील वरळणें.

**वणिज**—स्त्री. १ व्यापार; वाणिज्य. वणज पहा. -ज्ञा ६.११०. २ (सामान्य) व्यवहार. 'ययां कौरवांचिया घरा। शिष्टाई धाडिलासि दातारा। ऐसा वणिजेसाटीं जागेश्वरा। विकिलासि आम्हीं।' -ज्ञा ११.५४२. [सं. वणिक्-ज्; वाणिज्य] **वणिक्-ज**-पु. १ व्यापारी. २ वाणी; बनिया. 'मारिति हाका केवळ नागविला वनिं जसा वणिक् सार्थे।' -मोकृष्ण ८६.२६.

**वणिज**—न. ववादिकांतील ६ वें करण. करण पहा. [सं.]

**वणी**—पु. (महानु.) घाव घालणारा; मारणारा. 'रणीं जुझारू घायेवाटे। तरि वणियां न वंधिजाति पाटे।' -भाए२४१. [सं. व्रणिन्; प्रा. वणि]

**वणी**—अव्य. (रूढ) वाणी पहा. सारखा; प्रमाणें. 'तो सांगे पळाला भुतावणी।' -दावि ४७१.

**वणी**—समासांत पाणी या अर्थानें हें रूप येतें. उदा० गुळवणी (गुळाचें पाणी=मराठ्यांतलें कालवण); आंबवणी (उंसाच्या पिकास द्यावयाचें पाणी); चिंववणी, काढवणी इ० [सं. वन; प्रा. वण=पाणी]

**वणोटा**—पु. रंगाचा पट. [सं. वर्ण; वण+पट्टा]

**वत्**—प्रत्यय. जसा; सारखा; प्रमाणें; सदृश. उदा० तद्वत्; एतद्वत्; ब्राह्मण-क्षत्रियवत्.

**वत-ती**—स्त्री. बाजू. वतीं, वतीनें या विभक्तींत उपयोग. वतीं-तीनें पहा.

**वत**—पु. व्रत पहा.

**वंत**—पु. (कों.) वांटा; हिस्सा (वडलार्जित मिळकत, व्यापार इ० तील). 'माझा ज्येष्ठपणाचा वंतु। वेगळा करी पा यज्ञदत्तु।' -कथा ५.१५.१०. ०दार-पु. भागीदार.

**वंत**—बाळगणारा, धरणारा, धनी या अर्थी नामांना जोडून येणारा प्रत्यय. उदा० द्रव्यवंत; भाग्यवंत; धैर्यवंत इ० [सं. वत, वान्]

**वतणी, वतणें**—ओतणी, ओतणें पहा.

**वतणें**—अक्रि. (प्र.) उतणें पहा.

**वतन**—न. १ वंशपरंपरेची चाकरी, धंदा, अधिकार, नेमणूक, उत्पन्न; उपजीविकेचें साधन. -गांगा १६. २ मालकीची जागा; जन्मभूमि; घर. ३ इनाम; बक्षीस. 'दिधलों गुरु प्रसादप्रभुनें पूर्वोक्तसद्गुणां वतन।' -मोकर्ण २०.२९. ४ वंशपरंपरा हक्क (जमीन, वृत्ति इ० त). [अर. वतन्=जन्मभूमि, घर. तुल० सं. वर्तन=उदरनिर्वाह, वेतन] ०गाडणें-एखाद्या जागीं मालकी, सत्ता असणें (नेहमीं नास्तिपक्षीं उपयोग). 'तूं नित्य येथें येऊन बसतोस, काय येथें तुझें वतन गाडलें आहे.' ०गाडलें-न. (गाडलेलें वतन) जुनी किंवा फार दिवस ताब्यांत असलेली मिळकत. 'माझी वंशपरंपरा ह्या जागेवर नांदून वतनगाडलें आहे तें मी सोडणार नाहीं' ०जप्ती-स्त्री. वतनी जमीन किंवा तीवरील उत्पन्नाची जप्ती. ०दार-पु. वतन असलेला; वतन धारण करणारा. 'वतनदारांचीं वतनें वतनदारांच्या दुमाला केल्या विरहित पोटतिडीक लागोन मुलूक मामूर होत नाहीं.' -रा१६.४४ (कायदा) वंशपरंपरेनें सरकारी काम करण्याचा हक्क असणारा इसम. 'तीर्थोपाध्याय, मंदिरवाले, दरगेवाले, फिरस्ते, हुन्नरी व मनोरंजनाचा धंदा करणारे, भिकारचोरटे वगैरे वतनदार स्वतःला म्हणवितात. ...सर्व गांवकऱ्यांना मग ते कोणत्याहि धंद्यावर पोट चालवोत वतनदार ही सामान्य संज्ञा आहे. -गांगा १५. [फा.] ०दार-हिजडा-पु. हिजडा पहा. ०दारी-दारकी-स्त्री. वतनाचा हक्क, मालकी; वतन असणें ०दारीकरी-पु. (वतनदार) (कों.) फार जुना शेतकरी. ०पत्र-न. वतनाची सनद, दस्तऐवज. ०बंधु-भाऊ-पु. १ वडिलोपार्जित मिळकतींत हक्क असणारा; भागीदार. २ सह-अधिकारी (वंशपरंपरागत); देशमुखबंधु. वतन-वहीण असाहि शब्द येतो. ०वाडी-स्त्री. वतन, वतनी शेत, वाडी इ० (व्यापकपणें); जमीनजुमला; इस्टेट. 'वतनवाडी पाहून मुलगी देणें तर द्यावी.' **वतनी**-वि. १ वडलोपार्जित किंवा विकत घेतलेली (जमीन, मालमत्ता इ०). २ वतनासंबंधीं (दस्तऐवज, कागदपत्र, इ०). ३ वतन आहे किंवा जन्म झाला तें (ठिकाण). **वतनी मिळकत**-स्त्री. (कायदा) वंशपरंपरेनें सरकारी काम करण्याच्या मेहनतान्याबद्दल मिळकत किंवा नक्त नेमणूक.

**वतन-नी**—ओतणें-णी पहा.

**वतबळी**—स्त्री. (क.) कांकण घट्ट बसावें म्हणून मध्यभागीं खांच पाडून तयार केलेलें पत्र्याचें कांकण. [सं. वृत्त+वलय]

**वतरणें, वतारणें**—अक्रि. १ संचरणें (पिशाचानें शरीरांत). २ अंशा संचारानें संचलनविशिष्ट होणें (माणसानें, जनावरानें); पछाडलें जाणें. [अवतरणें]

**वतल-लें**—न. (व. है.) अवेल; वैल. 'वतलावर आधण ठेव.' ओतल पहा. [सं. अव किंवा उत्+तल ?]

**वतवत**—स्त्री. १ रिकामें भटकणें, फिरणें. 'त्वां दिवसभर वतवत केलीस आतां जेवायाला तांतडलास.' २ वटवट; बडबड; वकबक. ३ वदलणें [ ध्व. ] **वतवत-तां**-क्रिवि. १ वटवट लावून; बडबडून. २ वरवून; अश्लिष्टपणें. (क्रि० करणें; बोलणें). ३ वचवच पहा. (क्रि० खाणें; जेवणें). ४ रिकामपणें; रमतगमत. (क्रि० फिरणें; करणें). **वतवतणें**-अक्रि. १ वटवट करणें; बडबडणें. 'तें नाहीं तरीं किती । वतवतु ।' -अमृ ७.८४. २ तणतणणें; क्रोधावेशांत चडफडणें.

**वंतसें**—नस्त्रीअव. (रूढ) वनसें पहा.

**वताणा**—पु. (चांभारी) सागळ व आस्तर यांमधील भाग.

**वतारणें**—अक्रि. वतरणें पहा.

**वतारी, वतींव**—ओतारी, ओतीव पहा.

**वतावत-तां**—क्रिवि. वतवत-वतां चा अतिशय.

**वताळ**—पु. वार; जखम. -मनको.

**वताळणें**—क्रि. १ (व.) बडबडणें. २ गर्जना करणें. 'गजारूढ वताळे भाट ।' -कृमुरा २५.७२.

**वतीं, वतीनें**—क्रिवि. तर्फे; बाजूनें; बद्दल. 'ने. ना. दिवाण साहेब यांहीं श्रीमंतांवतीं स्वीकार करावा.' -अहेर बहुमान पोषाक नियम ६. **वतीचा**-वि. बाजूचा; पक्षाचा. आमच्यावतीं व तुमच्यावतीं हे शब्द व्यापारी, पेढीवाले यांच्या हिशेबांतून सावकार-कूळ यातर्फे अशा अर्थानें येतात.

**वत्त**—न. १ (बे.) नदीला पूर आल्यावर पाण्यास येणारी फूग. ओत पहा. [ का. ओतु=पूर ]

**वत्तर**—स्त्री. (व. ना.) १ हंगाम; योग्य संधी. २ विपुलता; समृद्धि.

**वत्स**—पुन. १ गाईम्हशीचें पोर, बालक; वासरूं.-ज्ञा ७.१२०. 'तुका म्हणे वत्स धेनुवेचे चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ।' -तुगा २२०१. २ बाळ; मूल. लहानाला प्रेमानें संबोधितात. 'भीष्म म्हणे वत्सा जरि पुससी सर्वांत कोण पूज्य असे ।' -मोसभा २.२८. ३ रत्नागिरीजवळील ब्राह्मणांची एक जात व तींतील व्यक्ति. [ सं. ] **०द्वादशी**-स्त्री. आश्विन वद्य १२. या दिवशीं सवत्स धेनूची पूजा करतात. वसुबारस पहा.

**वत्सनाभ**—पु. एक प्रकारचें विष; वचनाग. [ सं. ] **वत्सनाभाम्ल**-न. (शाप.) वचनागांतील अम्ल. (इं.) ॲकोनिटिक ॲसिड.

**वत्सर**—पु. वर्ष; संवत्सर. [ सं. ]

**वत्सल**—वि. प्रेम करणारा; दयाळु; कृपाळु; आवडता; काळजीचा. -ज्ञा १२.२४२. (समासांत) अनाथवत्सल; दीनवत्सल; भक्तवत्सल. [ सं. ] **वत्सलता**-स्त्री. वात्सल्य; स्नेह; मायाळुपणा.

**वथ**—स्त्री. (व.) व्यथा (कुंथण्याची). [ सं. व्यथा ]

**वंथ**—पु. वांटा; वंत पहा.

**वथज्या**—क्रिवि. (ना.) तिकडे.

**वथणें**—अक्रि. मूर्खपणें बडबडणें; नको तें बोलणें.-अक्रि वटवट करणें; वकणें. [ वदणें ? ] **वथूऱ्याणें**-क्रि (कु.) झोंपेंत बडबडणें.

**वथंबणें, वथंबा**—ओथंबणें, ओथंबा पहा.

**वद**—न. (व.) दंव. **वदाड**-न. (व.) १ दंव. २ सर्दी.

**वंदक**—वि. पूजा, भक्ति करणारा; भक्त. [ सं. ]

**वंदट**—न. (क.) वांबळ; अभ्राच्छादित आकाश.

**वंदण**—न. (प्र.) ओंदण पहा.

**वदणूक**—स्त्री. १ स्पष्ट, उघड करणें; सांगणें; वर्णन देणें. २ कबुली; कबुलायत; मान्यता. ३ पंचाकडून इमान करवणें. -भाअ १८३२. [ वदणें ]

**वदणें**—उक्रि. १ उघड करणें; मनांतलें, लपवून ठेवलेलें बोलूं लागणें; कबूल करणें. २ प्रतिपादणें; जाहीर करणें; मोठ्यानें बोलणें. ३ -अक्रि. (सामा.) बोलणें; सांगणें. 'आतां पाल्हाळ टाकोनि सत्वर । संतचरित्रें वदावीं ।' [ सं. वद् ] **वदंता**-स्त्री. बातमी; बोलवा; जनवार्ता. [ सं. वदंती ] **वदंती**-स्त्री. १ भाषण; बोलणें. 'हे ब्रह्मीची वदंती । तुज निवेदिली गा भूपती ।' -कथा ६.१२. ७४. २ वचन; वाक्य. 'अव्यक्त वादनर्ती । अव्यक्त ऐसी वंदती ।'-ज्ञा १४.६९. ३ वार्ता; बोलवा. 'मग कल्पादीं पुढती । मींचि सृजीं ऐसी वदंती ।' -ज्ञा ९.१०५. ४ उपदेश; उच्चार. 'पै गुरुशिष्यांचिया एकांती । जे अक्षरा एकाची वदंती ।' -ज्ञा १०.१२६. ५ वटवट; बडबड. 'गाडींतून उतरल्यापासुन आपलीच एकसारखी वदंती चालू आहे. आम्हीं बोलावं केव्हां ?' -भयंकरदिव्य. [ सं. ] (वाप्र.) **वदतोव्याघातः**-उघड विरोध; स्पष्ट विसंगतता; उघड असणाऱ्या विरुद्धतेचें प्रतिपादन करणाऱ्याविषयीं योजतात. **वदव(वि)णें**-उक्रि. बोलविणें; बोलावयास लावणें; तोंडातून काढणें. (वदणें प्रयोजक)

**वंदणें**—उक्रि. १ नमस्कार करणें. २ सत्कार करणें; पूजा, भक्ति करणें. ३ आदर बाळगणें; मानणें. 'कोणी वंदा कोणी निंदा । आपला स्वहिताचा धंदा ।' [ सं. वंदन ] **वंदन**-न. वंदणें; नमस्कार. २ आदर दाखविणें; मान्यता; सत्कार. ३ सेवा; पूजा. [ सं. ] **वंदनभक्ति**-स्त्री. उपासना मार्गांतील नवविधा भक्तींमधील एक अंग. **वंदनशील**-वि. १ फार आदर दाखविणारा. २ सभ्य; प्रशंसापर; गौरवपर. **वंदनीय**-वि. वंदायास योग्य; पूज्य; सेव्य. [ सं. ] **वंदित**-वि. वंदिलेला; पूजिलेला. [ सं. ] **वंद्य**-वि. वंदण्यास योग्य; वंदनीय. -ज्ञा १.५४.

**वदन**—न. १ मुख; तोंड. 'वृथा गेली आंगवण । काय वदन दाखवितां ।' -एरुस्व ८.६. (समासांत) चंद्रवदन; पद्मवदन;

म्लानवदन इ० २ (गणित) श्रेणीतील पहिलें पद. [ सं. ] वदनामृत-न. भाषण. -ज्ञा १५.५८८. [ वदन+अमृत ] वदनेंदु-न. मुखचंद्र ( सुंदर मुखाच्या वर्णनांत उपयोग ). 'उदय अस्तावीण संपूर्ण । वदनेंदु श्रीकृष्णाचा ।' -एरुस्व १.५५. [ वदन+इंदु ]

**वंदन**—न. १ चिवडाचिवड; कालवाकालव ( जेवणांत अन्नाची ) २ अस्ताव्यस्त पसरणें; उधळणें; फेंकणें. ( क्रि० करणें ).

**वदर**—स्त्री. भीति; कदर. 'ठेऊन चित्तामध्यें वदर भिऊन या जना ।' -होला १०६. [ दर, डर; आदर ]

**वदर**—पु. (व.) थर. [ सं. दृ-दर ] **वदरणें**-अक्रि. ( व. ना. ) १ विरणें; फाटणें. २ गळून पडणें; ओघळून जाणें.

**वदळ**—स्त्री. वरदळ पहा.

**वदळ**—पु. ( कों. ) समुद्राच्या लाटामुळें किनाऱ्यावरील वाळूमध्यें होणारा उंचसखलपणा; उंचसखल रेषा, वळचा.

**वदान्य**—वि. १ उदार; दाता. 'धर्मिष्ठ वदान्य सत्यवचन। सन्मुख रणीं पावला मरण ।' -जै २१.२९. २ वाक्पटु; वक्ता. [ सं. ]

**वंदारुता**—स्त्री. वंदन करावें अशी इच्छा; आदर; भक्ति. 'वांछा सज्जनसंगमीं गुरुकुळीं वंदारुता नम्रता ।' -वामन स्फुटश्लोक ( नवनीत पृ. १३७ ). [ सं. ]

**वद्य**—पु. कृष्णपक्ष; महिन्याचा दुसरा पंधरवडा. -वि. या पक्षासंबंधीं ( तिथि ). उदा० वद्य एकादशी. [ सं. ] ०पक्ष-पु. कृष्णपक्ष. याच्या उलट शुद्धपक्ष.

**वध**—पु. १ मारणें; घात; नाश; संहार. -ज्ञा १.२२८. 'परनिंदेनें परवध, आत्मस्तवनेंहि आत्मवध होतो ।' -मोकर्ण ४२.६१. ( समासांत ) पितृ-मातृ-भ्रातृ-मनुष्य-राज-ब्रह्म-गो-वध. २ ( गणित ) गुणाकार; घात. [ सं. ] ०घटी-स्त्री. मरणकाल. ०स्तंभ-पु. देहांतशिक्षा देण्यासाठीं पुरलेला खांब. **वधणें**-सक्रि. ठार मारणें; नाश करणें. -ज्ञा १.२०६. **वधिता**-वि. मारणारा. -ज्ञा २.१३८. **वध्य**-वि. मारण्यास योग्य; शक्य; वधार्ह. -ज्ञा २.१३८. [ सं. ]

**वध( धा )णा**—वाधणा पहा.

**वधणें**—सक्रि. ( व. ) तुटलेली दोरी वाख वगैरे लावून पुन्हां वळणें; वाढविणें. [ सं. वृध्; सिं. वधणु; गु. वधवुं ]

**वधर**—शअ. ( व. ) वर. 'घराच्या वधर फांदी आली.' सं. उत्-धृ-धर ]

**वंधा**—पु. ( व. ) पीळ; गुंफणी. [ सं. बंध ]

**वधारा**—स्त्री. ( वडोदे ) वाढ. 'केलेल्या प्रमाणांत परिस्थित्यनुरूप वधारा करण्याची आवश्यकता वाटल्यास...'-वडोदें, सत्कार नियम ८. [ सं. वृध्-वर्धय; प्रा. वद्धार; गु. वधारो ] **वधारणें**-क्रि. वाढणें; मोठा होणें.

**वधू**—स्त्री. १ नवरी; जिचें लग्न ठरलें आहे, चाललें आहे अशी स्त्री. -ज्ञा १४.३. २ पत्नी. ३ उपवर कन्या; स्त्री; विवाहयोग्य वयापासून यौवनदशा येईपर्यंतची स्त्री. 'भुले सुकवि वाग्वधू तव गुणा अनर्घ्या नगा ।' -केका ९९. ४ ( सामा. ) स्त्री. 'राजीवाक्ष असा विलोकुनी वधू धांवे जशी बावरी ।' -गाशबरी ९. [ सं. ] ०पक्ष-पु. लग्नामध्यें नवरीकडील पक्ष. ०पक्षीय-वि. वधूपक्षासंबंधीं; नवरीमुलीकडील ०प्रवेश-पु. १ विवाहानंतर नवरीनें नवऱ्याच्या घरीं समारंभानें येणें. २ या वेळचा विधि; घरभरणी. ०माय-स्त्री. ( काव्य. ) नवरीची आई ( लग्न समारंभांत या नांवानें तिला संबोधितात ). [ माय=माता ] ०वरें-न.अव. विवाहसमारंभांतील वधू आणि वर उभयतां मिळून; जोडपें; नवरानवरी. ०वस्त्र-न. लग्नाच्या वेळचें वधूचें पातळ; अष्टपुत्री. **वधूटी**-स्त्री. आड वायको; अर्धवट प्रौढ स्त्री.

**वंध्य**—त्रि. १ फळें न धरणारा ( वृक्ष ); अनुत्पादक; वांझ. २ निष्फळ; व्यर्थ ( प्रयत्न, इ० ). 'पसरोनि शीघ्रं कवळी नमुनि म्हणे न करि वंध्य आशांतें ।' -मोकर्ण (नवनीत पृ.३३२). **वंध्या**-स्त्री. जीस मुलें होत नाहींत अशी स्त्री; वांझ. **वंध्यापुत्र-सुत**-पु. ( वांझेचा मुलगा ). ( ल. ) अशक्य कोटींतील, असंभाव्य गोष्ट. खपुष्प पहा. **वंध्येची सुता**-स्त्री. वरील प्रमाणेंच अशक्य गोष्ट. 'वेगळेपणाची माता । ते लटिके वंध्येची सुता ।' -दा ६.१०.३५. **वंध्यामैथुन**-न. ( वांझेशीं रतिक्रिडा ) अनुत्पादक, व्यर्थ, निष्फळ श्रम; निष्फळ व्यापार.

**वन**—न. पाणी. 'अति-सहवासि-वच मना कतक कलुषिता वना निवळवील ।' -मोविराट ३.१६. [ सं. ] ०द-पु. मेघ.

**वन**—न. १ रान; अरण्य; जंगल. २ ओसाड, निर्जन प्रदेश. ३ ( समासांत ) पान या अर्थी उपयोग. 'तरी वद्धमूळें अज्ञानें। महदादिकीं शाखनें । वेदांचीं थोरवनें घेऊनियां ।' -ज्ञा १५.१४७. ४ ( समासांत ) वन्य, रानांतला, जंगली या अर्थी. उदा० वनपुष्प-वृक्ष, वनगाय. -स्त्री. १ चराई. २ गुरचरण; गायरान. ३ ( व. ) कणसें खुडण्याबद्दलचा मोबदला. [ सं. ] ०कर-पु. वनरक्षक; 'तंव ते वनकर समग्र । गाऱ्हाणें सांगों पातलें ।' -ह ३१.८९. ०क्रीडा-स्त्री. जंगलांतील खेळ; रानांतून भटकणें इ०. ०गाय-स्त्री. १ गायींची एक जंगली जात. हें जनावर भात खातें. २ कोचिनीलचा किडा. ०चर-पु. १ पौराणिक नाटकांतील विदूषक. २ माकड. (ल.) इंग्रज; टोपीवाले. 'वनचर हातें पृथ्वी केली निक्षेत्री ।' -ऐपो ४०४. -वि. १ वनांत काळ कंठणारा; वनवासी ( वाघ, सिंह इ० प्राणी ). २ जंगली; रानवट. ०चराई-स्त्री. गुरांना सरकारी माळरानावर चारण्याबद्दल द्यावयाची पट्टी; चारणावळ. ०देवता-देवी-स्त्री. वनाची अधिष्ठात्री देवता. ०पशु-पु. जंगलांतला, न माणसाळलेला प्राणी.

०प्रस्थ-न. वानप्रस्थाश्रमांतील माणसांना राहण्याचें जंगलांतील ठिकाण; एकांतवास. ०भोजन-न. अरण्य, उद्यान अशा जागीं जाऊन केलेला जेवणाचा समारंभ. ( इं. ) पिक्निक्. 'शक्ति पूजोन वनभोजन। लहानथोरीं संपादिलें।' -ह ३२.२२२. ०मक्षिका-स्त्री. जंगली माशी. ०माला-ळा-स्त्री. १ वनपुष्पांची माळ. २ देवाच्या गळयांतील फुलें, तुळसी इ०ची गुडघ्यापर्यंत लोंबणारी माळ; विष्णूचें कंठभूषण. -एभा ३.५५१. ३ वनांची ओळ, रांग, पंगत. ०माली-ळी-पु. विष्णु; कृष्ण. 'धरिं ध्यानीं हरि वनमाळी। -देप ७१. ०माशी-स्त्री. वनमक्षिका पहा. हिमालयांत अशा माशा असून त्या चावल्या कीं गळवें येतात. -तीप्र ६५. ०राज-पु. सिंह. 'तुज वनराजा काय ग्रहदशा आली।' -विक ९०. ०वाशा-शी-वि. १ हालअपेष्टा काढणारा; नेहमीं अभागी. २ (व.) वाईट पायगुणाचा; सत्यानास घडवून आणणारा. ३ (व.) नासाडया; नाश करणारा. ०वास-न. १ अरण्यांत राहणें; जंगलांतील वस्ती. २ आयुष्याला स्थिरता नसणें; भटकत राहणें. ३ प्रवासांतील हाल, दुःख. ४ वाईट दिवस; संकटकाल. 'आला कसा कपाळा वनवास।' -विक ३६. ०वास आणणें-१ छळून, त्रास देऊन घरावाहेर काढणें. २ फार सतावणें; गांजणें. 'ह्या पोरांनीं मला वनवास आणिला आहे.' ०वासवन-वासवाडी-स्त्री. (काव्य) सोयीचें आश्रयस्थन म्हणून पत्करलेला अरण्यवास. ०वासी-वि. १ अरण्यांत राहणारा. -ज्ञा ३.२३५. २ वनवाशा पहा. ०विहार-पु. वनक्रीडा पहा. 'राव चालिला वनविहारार्थ। विलोकीत वनश्रीतें।' ०विहारी-वि. वनांत आनंदानें राहणारा, विहार, क्रीडा करणारा. ०शाई-ही-स्त्री. वनवास. 'कैकयीच्या कल्हानें तदुपरी वनशाई।' -राला ९. ०श्री-लक्ष्मी-स्त्री. फल-पुष्पसंभारानें वनाला आलेली शोभा; अरण्यशोभा. -ज्ञा ३.१००. ०सरणी-स्त्री. रानांतील मार्ग. 'चित्राश्व म्हणे दयिते गमली वन-सरणि काय कोमळ ती।' -मोवन १३.४१. ०हरिद्रा-स्त्री. रानहळद. वनाई-स्त्री. वनचराई. -केसरी २६.७.३०. वनानी-क्रिवि. वनोवनीं; प्रत्येक वनांत. 'अतीरती कुलखप्पी झाले हिंडुं लागले वनानी।' -अफला ७६. [ वन द्वि. ] वनाळी-स्त्री. झाडांची रांग; राई; झाडी. 'छाया तियेस दुसरी तिसरी वनाळी। जे सांवळी युवतितुल्य दिसे निराळी।' -र २३. [ वन+आली ] वनेचर, वनौक-स-वि. वनचर पहा. 'अटवियें माजी जैसा। वन्हि रिघतां सहसा। लंघिती कां दिशा। वनौकें तिये।' -ज्ञा १८.१५३१. वन्य-वि. १ वनांतील; वनांत राहणारें, वाढणारें. -ज्ञा १८.१०६५. २ जंगली; रानवट. ३ वनवासी. 'सरलें माझें सर्वहि पुण्य। होऊनि वन्य काय फिरूं।' -मराठी ६ वें पु. (१८७५) पृ. १७४. ४ रानटी मनुष्य; असंस्कृत मनुष्य; वृक्ष, प्राणी वगैरेची पूजा करणारा. (इं.) ॲनिमिस्टला प्रतिशब्द. -ज्ञाको. वन्यता-स्त्री. रानटी अवस्था. 'वन्यता आणि सुधारणा यांची अजून व्हावी तशी फारकत झालेली नाहीं.' -आगर ३. २०. [ सं. ]

वन-पु. गोसाव्यांचा एक पंथ व त्यांतील व्यक्ति. [ सं. ]

वन-पुन. चिन्ह; खूण; वण पहा.

वनई-स्त्री. निरगुडी. -बदलापूर ६९.

वनबंदी-स्त्री. एक वाद्य. 'घडयाळ वनबंदी झडूं लागली।' -पाळणेसंग्रह (शाहूमहाराजांचा पाळणा) ६.

वनवणें-अक्रि. करपणें; जळणें. 'तापानळें कवळलें। सूत्रजात वनवलें।' -ऋ ३३.

वनवन, वनवनवाणा-णी-क्रिवि. वणवण पहा. (क्रि० फिरणें; हिंडणें; बहकणें; भटकणें)

वनवलिया-वि. वणव्यांत सापडलेला. 'कीं मळयागिरीचां माथां। वनवलिया चंदनलता।' -शिशु ७५१.

वनवा-पु. १ दावानल; वणवा पहा. 'रयतेला लागला वनवा जळती अंत्रीं।' -ऐपो ४०४. २ (खा.) त्रास; जिवाची आटापीट.

वनसें, वन्सें-न.स्त्री.अव. नवऱ्याची वहीण (नेहमीं अनेकवचनी प्रयोग. (वनसें हें रूप स्त्रीलिंगांत सुद्धां येतें). [ सं. भगिनी+सा; पतिस्वसा-वइससा-वइंसा-वयन्स-वन्सं. -भाअ १८३३; वहिनी+असा ]

वनस्पति-स्त्री. १ लता, वृक्ष, झुडप इ० २ औषधी झाड. 'ही कांहीं तरी वनस्पतिच असली पाहिजे.' -स्वप १५५. ०शास्त्र-न. वनस्पतीविषयीं संपूर्ण ज्ञान करून देणारें शास्त्र. (इं.) बॉटनी.

वनस्फुरा-वि. (महानु.) विस्तताररूप. 'समीप वनस्फुरा। ते म्हणों भक्ति क्षेत्रिचा धुरा।' -ऋ ८७.

वनाळ-वि. अंगावर वण असलेला. ? 'काळे माणूस गोरे होयेना। वनाळास येत्न चालेना।' -दा १४.६०.२. [ वण+सं. आलय=आळें ]

वनिता-स्त्री. स्त्री; वधू; नारी. -ज्ञा १.१८७. 'जोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी। जंव सुंदर वनिता दृष्टी पडली नाहीं।' -तुगा ३२३८. [ सं. ]

वनेर-पु. मुंगसाच्या जातीचा एक प्राणी. कांडेचोर पहा.

वन्निक-पु. (मुद्रण) ग्रेटपायमर पेक्षां थोडा मोठा टाईप. [ इं. ]

वन्समोर-क्रिवि. (नाटय) पुन्हां एकदां; आणखी. नाटकांतील एखादें पद चांगलें आवडल्यास तें पुन्हां म्हणण्यास सांगण्यासाठीं हा इंग्रजी शब्दप्रयोग योजतात. 'हर्षे टाळया पिटुनि अवघे गर्जती 'वन्समोर।' -अर्वाचीन ३८८. [ इं. वन्स मोअर ]

**वन्हि**—पु. अग्नि. -ज्ञा १.२५८. [सं.] ०त्व-न. आग; तप्तता. -ज्ञा १८.२२०. ०यंत्र-न. तोफ. 'त्यामोंवतीं केवळ वन्हियंत्रें।' -सारुह ८.५३. -वामन विराट २.११. **वन्हिधूमन्याय**-पु. (जेथें धूर तेथें अग्नि) सतत साहचर्य दाखविण्यासाठीं योजतात.

**वन्हार**—पु. (व.) एक नीच जात; महार.

**वपणी**—स्त्री. ओप देण्याचें हत्यार. ओपणी पहा.

**वपणी-णें**—ओपणी, ओपणें पहा.

**वपन**—न. १ बीं पेरणें; पेरणी. २ (सामा.) हजामत; श्मश्रु. डोकें इ०चे केंस काढणें. 'मस्तकवपन आणा पाणी। नाहीं आड ना विहीर वर्णी।' -एरुस्व १२.१४८. ३ (विशेषतः) विधवा स्त्रीचें क्षौर करणें. [सं.]

**वपविणें**—(प्र.) ओपविणें पहा. **वपींव**-ओपींव पहा

**वपा**—स्त्री. १ हाडामांसाचा चिकचिकीत रस. २ हाडांतील मज्जा. ३ काळजावरील केळीच्या कोंवळ्या पानासारखा असणारा पापुद्रा. 'दर्भमुष्टिच्या गर्भि धरुनिया निर्भर पशुच्या वपा।' -राला ८७. ४ चरबी. [सं.] **वपिन**-न. (शाप.) चरबीचा मुख्य घटक; (इं.) स्टिअरिन. याच्या मेणवत्त्या करतात.

**वपारी**—स्त्री. (व.) पाळी; आवृत्ति.

**वपु**—पुन. देह; शरीर. -ज्ञा १.३. 'जिकडे वपु तिकडे मन युक्त न शोभेल अन्यथा नातें।' -मोभीष्म ४.५. २ त्वचा. 'मृदु आणि कठिण। हे स्पर्शाचे दोन्ही गुण। जे वपूचेनि संगें कारण। संतोषखेदां।' -ज्ञा २.११५. [सं.]

**वप्ता**—वि. पेरणारा. [सं.]

**वफा**—स्त्री. नेकी. इमानीपणा; निष्ठा. [अर.] ०कीश-दार-वि. इमानी; निष्ठावंत. [अर.] ०दारी-स्त्री. इमानीपणा. 'तुम्ही इमानें इतबारें वफादारीनें चालोन चाकरीची सरबरा ठेवाल तों पावेतों जहागीर-बे-खल चालेल' -ममंब १६.

**वफात**—स्त्री. मृत्यु. 'वाटेंत लसलीन वफात पावले.' -ख ७.३५७३. [अर. वफात्]

**वंब**—स्त्री. (तंजा.) वाचाळता; बडबड. [ता. ?]

**वंबण, वंबणें, वंबळणें, वंबी**—ओंबण, ओंवणें इ० पहा.

**वमक**—न. वांति; वमन पहा. 'दिवसंदिवस वमक वाढे।' -दावि ३०. [सं.] **वमणें**-अक्रि. ओकणें. -ज्ञा ६.२४१. 'तंव वळिभद्रे दिधली लाथ। येरू अशुद्धातें वमित।' -एरुस्व १०.५१. **वमन**-न. वांती; ओकारी. 'कोण नाहीं दक्ष करितां संसार। आम्हीं हा विचार वमन केला।' -तुगा १९६७. [सं.]

**वय**—न. १ उमर; आयुर्मान; आयुष्य; जन्मापासूनचा काल. २ तरुणपणा; ज्वानी. ३ उतार वय; वृद्धावस्था. 'आमचें वय झालें.' [सं. वयस्] **वयांत येणें**-१ तारुण्याच्या भरांत येणें; तरुणपणा प्राप्त होणें. २ विवाहयोग्य होणें; समजूं लागणें. 'ती वयांत आल्यावर तिच्या बापानें तिचें लग्न करून दिलें.' -मराठी ३ रें पु (१८७३) पृ. २०. ३ (कायदा) सज्ञान होणें; व्यवहाराला लायक होणें. **वयसा**-स्त्री. १ वय; आयुष्य. 'सार्थकेविण वेची वयसा। तो येक मूर्ख।' -दा २.१.५४. २ तारुण्य. 'एकीं वयसेचें झाड वांचलें। मग मन्मथाचिये कासे लागलें।' -ज्ञा ७.८५. **वयस्क, वयस्कर, वयस्थ**-वि. १ प्रौढ; बरेंच वय उलटलेला; पोक्त. २ तरुणदशा प्राप्त झालेला; वयांत आलेला. 'माझा मुलगा वयस्क होऊन अविवाहित आहे.' ३ वयानें मोठा; वडील (सापेक्षतेनें). ४ (वयस्क)-वयाचा; वय असलेला समासांत उपयोग. उदा० समवयस्क. **वयस्य**-पु. (सारख्या वयाचा) मित्र; सखा. (स्त्रीलिंगी रूप वयस्या). 'चतुर तिजसमाना सर्व तीच्या वयस्या।' -सारुह २.७५ **वयातीत**-वि. वृद्ध; म्हातारा. **वयी**-वि. वय असलेला; वयाचा. समासांत उपयोग. उदा० अल्पवयी. **वयेसा**-वयसा पहा. **वयोगत-वृद्ध**-वि. फार वृद्ध; जख्खड. **वयोधर्मानें**-क्रिवि. वयमानानें; वय झाल्यानें; वयाप्रमाणें. **वयोवस्था**-स्त्री. आयुष्यांतील अवस्था. या तीन आहेत: बालत्व; तरुणत्व, वृद्धत्व.

**वय**—स्त्री. (व.) आजी (बापाची आई).

**वय**—स्त्री. वई; कुंपण. -लोक २.२४. वै. पहा. ०वाडा-पु. (कों.) घर, शेत इ०च्या भोंवतीं असणारें कुंपण.

**वयफळ**—वि. वायफळ पहा.

**वयचणें, वयरण-णें, वयरा, वयला, वयलाठी**—वैचणें, वैरण इ० पहा.

**वयला**—वि. वेगळा; वायला पहा.

**वया**—स्त्री. अव. ओंव्या; गाणीं; 'हडळी वया गाती।' -मसाप १.२. [ओवी]

**वयाळा-ळें**—पुन. पाण्यांतला एक बिनविषारी साप.[वाळा]

**वर**—स्त्री. प्रसूतीवेळची वार. वार पहा.

**वर**—पु. आशीर्वाद; शुभदायक वचन; ऋषि, देव, ब्राह्मण इ० नीं दिलेला प्रसाद, देणगी. 'वर दमनऋषीनें दीधला कीं तयाला।' -र १४. [सं.] ०दान-१ वर, आशीर्वाद देणें; देणगी; कृपेनें केलेलें दान. २ एखाद्याच्या हातून हटकून घडणारी गोष्ट; नेहेमीची, रूढ गोष्ट. 'चोरीचें त्याला वरदानच आहे.' ०दानी-वि. वर लाभलेला; भाग्यवान (वंश, कुल, व्यक्ति). ०दी-वि. वर प्राप्त झालेला (पुरुष, कुल, वंश इ०). ०प्रद-वि. अभीष्ट देणारा; वरद. **वरद**-पु. गणपति देवता. -वि. १ वरदाता; प्रार्थिलेलें देणारा. 'मग सहजें सत्कारवादु। तो पद्माकर वरदु।' -ज्ञा १.१३. २ प्रासादिक; कल्याणकारक. 'हा हरिविजय वरदग्रंथ।' -ह २२.२६९. ३ कृपाळु; दयाळु. ०चतुर्थी-चौथ-स्त्री.

भाद्रपद शुद्ध चतुर्थी; गणेशचतुर्थी. 'आम्हीं वरदचतुर्थीचा चंद्र अवचिता। देखिला गोकुळीं।' -ह २५.१३७. ०वाणी-स्त्री. आशीर्वाद; शुभचिंतन.' कीर्तनी रंग येतसे चौगुणी। वरदवाणी म्हणोनिया।' ०हस्त-पु. १ वर देण्यासाठीं (देवता इ० नें) उचललेला हात; दानशील, औदार्यदर्शक हाताची ठेवण. २ शिष्यांना विद्या देणारा गुरु, सर्व आश्रित किंवा संबंधी यांना उन्नतीला पोंचविणारा, किंवा ज्याचा आशीर्वाद खरा ठरतो अशाला लावितात. **०हस्त ठेवणें**-१ पूर्ण कृपा करणें. २ स्वतःसारखें करून सोडणें (निंदार्थी प्रायः उपयोग).

**वर**—पु. १ नवरा मुलगा (लग्नांतील). -ज्ञा ११.३. २ पति; नवरा. 'इंदिरावर'=विष्णु 'पर पुरुषाचे पायीं स्त्रियांनीं सोडून आपला वर।' -होला ६५. [सं.] ०घोडा-पु. १ वरात; लग्नानंतर समारंभानें वधुवरांची मिरवणूक. २ लग्नाला जातांना नवरा मुलगा पालखी, घोडा, गाडी इ० तून वाजतगाजत जातो ती मिरवणूक. ३ मुंजा मुलाची मिरवणूक. ०दक्षिणा-स्त्री वधूचा पिता कन्यादानाची सांगता करण्यासाठीं वरास देतो ती दक्षिणा; हुंडा; शुल्क. ०धवा-पु. नवरदेव; वरधावा पहा. 'वटेश्वर चांगा वरधवा। तुम्ही नेऊनि मध्यें बैसवा।' -चांगदेवगाथा. ०धावा-पु. १ नवऱ्यामुलास लग्नासाठीं घेऊन येण्यावरितां वाजत गाजत निघालेला मुलीचा भाऊ किंवा त्याचा बदला. २ नवऱ्याला मूळ. ३ (बडोदें) वरपक्षाकडून वराची स्वारी वधूगृहीं येण्यास निघाली अशी खबर देण्याकरितां समारंभानें जाणारा वराचा धाकटा भाऊ किंवा बदला. -ऐरापुविवि ८३. वऱ्हाड-नागपुराकडेहि हा 'वर्धाव' पाठविण्याची चाल आहे. ०निश्चय-पु. वर निश्चित करणें, ठरविणें. ०पक्ष-पु. लग्नांत नवऱ्यामुलाकडची बाजू; या बाजूची मंडळी. याच्या उलट वधूपक्ष. ०पक्षीय-वि. वरपक्षाकडील-कडचे (लोक, वऱ्हाडी, इ०). ०प्रस्थान-न. आपल्या जानवसेघरांतून लग्नमंडपाकडे जाण्यासाठीं वराचें निघणें; वरघोडा निघणें. ०बाप-पु. (लग्नांत) नवऱ्यामुलाचा बाप. ०माई-य-यी-स्त्री. (लग्नांत) नवऱ्यामुलाची आई. 'जात्या वरमाय आळशीण। मग काय पहावी वऱ्हाडीण।' -नव २१.२९. ०मायपण-न. नवऱ्यामुलाची आई असण्याचा मान. -एभा ? ०मूठ-स्त्री. १ लग्नांत वधूवरांच्या वस्त्रांना एकत्र मारलेली गांठ सोडवणाऱ्या मेहुणी वगैरे वधूपक्षीय स्त्रीला दिलेली देणगी. २ वधूच्या पित्यानें मुलगी वराला देतांना दिलेली देणगी; हुंडा; शुल्क. ०मूळ-न. वराला बोलावणें. 'वरमूळा चालिल्या अहिवा नारी।' -वसा ४८. ०योजना-स्त्री. कन्येसाठीं वराची केलेली योजना. **वरावर**-पु. श्रेष्ठवर. 'भीमकें अर्पूनियां अपार। कृष्ण वरावर पूजियेला. -एरुस्व १४.८७. [वर+वर] **वरावर, वरेकज**-स्त्री. लग्न जमविणें, जुळविणें. [वर+आवर, वर+काज] **वरेकज्या**-पु. लग्न जुळविणारा, मध्यस्थ इसम. **वरोपचार**-पु. लग्नांत (कांहीं ठिकाणीं नंतरहि) वराचे संस्कार व सोहळे. [वर+उपचार]

**वर**—वि. १ श्रेष्ठ 'मी वर म्हणे सुधन्वा कीं साक्षात् तात अंगिरा ज्याचा।' -मोसभा ५.९६. २ अत्युत्कृष्ट; अति सुंदर. 'वरतनु दमयंती नंदिनी हे त्रितीय।' -नल ६५. ३ पहिला; अग्र. 'वरसुत दम नामा दांत नामा द्वितीय।' -नल ६५. (समासांत) देव-द्विज-मनुष्य-तरु-पशु-पक्षी-वर. [सं.] ०कस-पु. वर्चस्व; अधिकार; सत्ता; अंमल (क्रि० बसवणें; चालवणें; चढवणें; मिळवणें). -वि. १ श्रेष्ठ प्रतीचें, कसाचें (सोनें). २ (सामा.) सर्वश्रेष्ठ; सर्वोत्कृष्ट. 'वरकसा जिणता जिणवेना।' -दावि ३७९. ३ सर्वांवर सत्ता गाजविणारा; ताब्यांत ठेवणारा; देखरेख करणारा. 'सर्व पशूंचा वरकस वाघ, पक्ष्यांचा वरकस बैरीससाणा, मुलांचा वरकस पंतोजी, उंदरांचा वरकस मांजर. ०कसदार-वि. अंमल चालविणारा; अमलदार; तपासनीस. वरकस अर्थ ३ पहा. **वरती**-वि. श्रेष्ठ. 'जे गतीहून वरती चढेना अधिक गती।' -एभा ३१. १५६. **वरांगना**-स्त्री. श्रेष्ठ स्त्री. [वर+अंगना] **वराचे**-वि. श्रेष्ठ. बहुताती वराचे यादव।' -उषा ७३.२७. **वरान्न**-न. १ पक्वान्न. 'अन्न वरिष्ठ वरान्न।' -एरुस्व १४.१२५. २ वरण. 'अवघ्यावरी वाढिलें जाण। वरी वरान्न स्वादिष्ट।' -एरुस्व १४. १२५. 'सोलीव डाळींचें वरान्न।' -मुवन ११.१२४. [वर+अन्न] **वराप्सरा**-स्त्री. प्रमुख अप्सरा (रंभा, मेनका इ०). 'शक्रप्रेषित वराप्सरा नटल्या।' -मोमंत्र २.४६. [वर+अप्सरा] **वरांवर**-वि. श्रेष्ठांत श्रेष्ठ. 'हेंचि निज ज्ञान साचार। वरांवर वरिष्ठ।' -एभा १०.७०६. [वरात् वर] **वरासन**-न. श्रेष्ठ आसन, स्थान. 'वरासनीं पाषाण। तो न मानावा सामान्य।' -तुगा २२६८. [वर+आसन] **वरिय**-वि. श्रेष्ठ. 'आग्रहाचिया उजरिया। श्रेष्ठ देवता वरिया।' -ज्ञा १७.९८. [सं. वरियस्]

**वर**—क्रिवि. १ पर्यंत; काल, मर्यादा किंवा प्रमाण यापावेतों. उदा० आजवर; वर्षावर; पायलीवर; खंडीवर. २ उंच; उच्च प्रदेशीं; उपरि. याच्या उलट खालीं. ३ नंतर; मागून. 'औरंगजेब मेल्यावर कोण गादीवर आला?' ४ अधिक; जास्त. 'त्या सभेंत शंभरावर लोक नव्हते.' ५ शिवाय; आणखी. 'आम्हाकडून काम करून घेतलेंच, वर आम्हाला शिव्या पण दिल्या.' ६ मुळें; कारणानें. 'पुरुषोत्तमरावांचें घर आपणांवरच चाललें आहे.' -इप ३२. ७ अनुरोधानें; लक्ष्यविषय करून. 'वाघावर एकटा कसा चालला आहे तो पहा.' 'या विषयावर चार घटका बोलत होता.' ८ परंतु. 'हे सारि ते वर थोडे। आणीकही साधील गाढे।' -ज्ञा १६.३५२. वरता, वरी पहा. [फा. वर; सं. उपरि; प्रा. उवरि तुल०] **०डोकें काढणें**-ऊर्जितावस्थेस येणें. 'ताराबाईनें नातवाला साताराची गादी साधून देऊन वर डोकें काढलेलें

जिजावाईला मानवलें नाहीं. '–भक्तमयूर केका५. ०तोंड करणें–निर्लज्ज बनणें; लाज न वाटणें. ०पडणें–(–वस्तु, गोष्टी) तत्परतेनें करूं लागणें. 'अलीकडे तो कादंबऱ्यांवर पडला आहे.' ०पाहणें–लज्जा, शंका, भीति न वाटणें; धीटपणा असणें; उजागरीनें वधणें. 'पापाला वर पाहण्याचा धीर होत नाहीं.' –पुण्यप्रभाव १३७. सामाशब्द– ०उपचार–पु अव. १ वरवर सभ्यपणा; शिष्टपणा दाखविणें; खोटी नम्रता; शिष्टाचार. २ रोगनिवारणासाठीं वाहेरून शरिराला केलेले उपचार. ०कडी–वर्चस्व; वरचढपणा. 'राज्यांत मुधोजीची वरकडी झाली कीं आपला तो सुड उगवील अशी कारभाऱ्यांस भीति पडली.' –विवि ८.६.११०. ०करणी–वि. बाह्य; औपचारिक; कृत्रिम; दिखाऊ; वरकांती; पोकळ (भाषण, कृत्य, इ०). ०कर्मी–वि. १ वरकरणी पहा. 'याचें असलें वरकर्मी वोलणें तुम्ही जमेस धरूं नका हो!' २ वाहेरचा; आंत ज्याचा प्रवेश नाहीं असा (रोग, औषध). ३ मूळचा झरा नसलेलें (जल इ०). ४ मूळ नसलेला; उपरी; स्थिरपणा, कायमपणा नसलेला. ५ पोकळ; दिखाऊ; खोटें. ०कर्मी आदर–पु. पोकळ, कृत्रिम आदर, भाव; आदरसत्काराचा खोटा देखावा. ०कांती–कांतीचा–वि. १ दिखाऊ; सुंदर; सुरेख दिसणारा. २ वरकरणी पहा. 'नाहीं शब्द रे बोललास वरकांतिचा।' –प्रला १५६. ०काम–न. प्रत्यक्ष बनावाचें काम न करतां त्याला साधनीभूत असणाऱ्या गोष्टी करणें. उदा० स्वयंपाकाला लागणारें साहित्य पुरविणें, धुणेंपाणी इ०. ०कोट–पु. थंडी, पाऊस इ०साठीं कोटावर घालावयाचा लांब कोट. (इं.) ओव्हरकोट. 'उलट वरकोट आणि हातमोजे हा नेहमींचाच पोषाक होऊन वसला आहे.' –सासं २.२३४. ०खर्च–पु. १ अधिक, योजलेल्यापेक्षां जास्त खर्च. २ इतर किरकोळ खर्च. ०खाल–क्रिवि. खालवर; उंचसखल; विषमरीतीनें. ०घडी–स्त्री. १ वस्त्राची घडी करतांना दर्शनी चांगला भाग यावा म्हणून अमळ वारीक विणून काढलेला पट्टा; वरची चांगली वाजू. २ (शिंपीकाम) वाहेरच्या वाजूला असलेली दुमड. 'वरघडीच्या तळाची व्यवस्था करावयाची असल्यास पांच इंच कापड अधिक घ्यावें.' –काटकर्तन ८. ०घडीचा–वि. १ वाह्य; वरचा. २ वरघडी असलेलें (वस्त्र). ३ (ल.) दिखाऊ; भपकेदार. ४ कृत्रिम; खोटें. ०घाट–पु. १ बाहेरचा आकार, घडण; बाह्य स्वरूप. २ घाटावरचा प्रदेश; सह्याद्रीच्या पूर्वेकडील मुलूख. ०घाटी–वि. वरघाटासंबंधीं (माणूस, पदार्थ इ०). ०घाटीण–स्त्री. घाटावरची स्त्री. ०घाला–पु. जोराचा हल्ला, घाला. 'षड्रिपूवरता वरघाला।' –दावि ३७९. ०चढ–वि. सरस; श्रेष्ठ; जास्त; वरच्या दर्जाचा. ०चढपणा–पु. सरसपणा; श्रेष्ठपणा. ०चष्मा–श्मा–पु. १ वरचढपणा; वर्चस्व. (क्रि० करणें; होणें). 'काकेशियन वर्गाचा दुसऱ्या वर्गावर नेहमीं वरचष्मा असे' –मराठी ६.३०६. २ देखरेख करणारा; तपासनीस; वरचा अधिकारी. ३ वर्चस्व गाजविणारा; अधिकार चालविणारा. ०जोर–वि. श्रेष्ठ. 'सीरजोर वरजोर जोर हा।' –दावि ३१०. ०डगला–पु. (बडोदें) वरकोट पहा. –खानो ३. ०डोळ्या–ळा–वि. १ उलट्या वाहुल्या असणारा; अदूरदृष्टि; नेत्ररोगी. 'परपुरुषातें नयनीं पाहे। उपजतां वरडोळी होये।' –गुच ३१.८५. २ आढ्यताखोर; रागीट. ३ टक लावून वर पाहणारा; वर दृष्टि असणारा (निंदार्थी उपयोग). ०तगड–न. दागिन्यावरचा तगडाचा अंश. ०दळ–न. भाजीवरोवर चव येण्यासाठीं शिजविलेली डाळ. [वर+दाळ] ०दळ–न. १ घरावर कौलें, गवत इ० घालण्यापूर्वी वांसे, पांजरण इ० पसरतात तें. २ वरचें कवच, साल. 'येक वरदळ वरें असतें। कठिण अंतर्यांगि दिसतें।' –ज्ञानप्रदीप ८३४. ३ वरचा भाग. 'अंग साजिरें नाकहीन। वरदळ चांग चरण क्षीण. –एभा ११.१२८५. ४ मुलामा. 'हावभावाचेनि वरदळें।' –भाए ३४५. –वि. १ वरवरचा; वाहेरचा. 'दाऊनियां वरदळ वेष। मना अंगीं आशापाश।' –निगा २८०. 'वरदळभक्तीं करोनिया नमन।' –नव १८.१६३. २ दांभिक. 'तुका म्हणे आम्हां तुमचेचि फंद। वरदळ छंद कळों येती।' –तुगा ५०७. ३ हलकें; नीरस; किरकोळ. [वर+दल] ०दळ–स्त्रीन. १ उपयोगांत, वहिवाटींत असलेले जिन्नस. 'चोर आले आणि वरदळ नेली.' २ नफा; वर मिळणारा फायदा. 'लाख रुपये मूळ पुंजी जें वरदळ मिळेल तें खातों.' ०दळखर्च–पु. जास्त खर्च. ०दळ जिंदगी–दौलत–स्त्री. सामान; जंगम माल. वरदळा–ळें–क्रिवि. वरून; वाहेरून. 'सेवन हें शिरसा धरीं। अंतरीं ही वरदळा।' –तुगा ३२२३. 'तेविं मनुष्य वेशाचें रूपडें। वरदळें दिसे चोखडें।' –ज्ञाप्र ७५०. वरदळ सामान–१ जंगम माल. २ किरकोळ माल, सामान. ०दक्षिणा–स्त्री. चोरी इ०कानें गेलेला पैसा, पदार्थ परत मिळविण्यासाठीं व्यर्थ खर्चलेला पैसा. ०दूध–न. अंगावरील दुधाखेरीज इतर दूध (लहान मुलास दिलेलें). वरचें दूध पहा. ०नट–क्रिवि. वरून; वरकांती. 'लई अंतरची खोल मोठी वरनट केवळ सात्त्विक दिससी।' –होला ८९. ०पंग–क–वि. वरवरचा; वाह्यात्कारी (देखावा). 'अवघा वरपंग सारा। पोटीं विषयाचा थारा।' –तुगा २८३२. ०पंक्याचा–पंगीचा–वि.क्रिवि. वरकरणी; वरकांती पहा. 'कीं वरपंगी जेवि जारीण। दावी भ्रतारसेवा करून।' ०पंकी–पंगी–पांगी–क्रिवि. वरवर; वाह्यात्कारी; वाह्यतः 'सामाजिक व धार्मिक रीति इंग्रजी शाळेंतला मनुष्य वरपांगी पाळीत असतो.' –टि ४.३७८. [वर+पंख] ०पंगतीचा–वरपंकी पहा. वरकांती. 'हा स्नेह नाहीं वरपंगतीचा।' –सारह १.३६. ०पिका–पीक–वि. झाडावर पिकलेला (फलादि पदार्थ). याच्या उलट

कोनपिका. ' वरपिका फणस असला तर मला दे. कोनपिका नको. ' [वर+पिकणें] ०बुजारत-क्रिवि. वरवर; बाह्यतः [वर + हिं. बुझारत] ०बट्टा-पु. नाणें मोडतांना पडणारा बट्टा. वाहेरबट्टा पहा. ०वंचाई-स्त्री. बाह्य भपक्यावरून झालेली फसवणूक. [वर+वंचणें] ०वंचाईचा-वि. वरकर्मी पहा. ०वर-वरता-वरतीं-क्रिवि.वि. १ आंत प्रवेश न होतां-करतां; बाहेरूनच (खोदणें, चोळणें इ०). २ थोडें फार, खोल नव्हे, अंतर्यामी नव्हे अशा रीतीनें. ३ वरकांती-वरपांगी; कृत्रिम; खोटें. ' तो मला वरवर प्रेम दाखवितो. ' म्ह० वरवर माया करती आणि तोंड झांकून खाती. ०वर करणें-केल्यासारखें दाखविणें; करण्याचें ढोंग करणें. वरवर बोलणें-रडणें-हांसणें-रागें भरणें-कृपा करणें इ० प्रयोग होतात. ०वर उपचार-पुभव. बाह्य, दिखाऊ आदरसत्कार; नुसता, पोकळ शिष्टाचार. ०वळा-पु. वर्चस्व; वलाधिक्य. ' देखोनि वैरियांचा वरवळा। कांपिन्नली भीमकबाळा। '-एरुस्व ८.५१. ०वेष-पु. बाह्य वेष; बुरखा; ढोंग. ०शेर-सर-सांड-स्त्री. भरपूरपणा; महामुरी; तुडुंब होऊन सांडणें. -वि. भरपूर; तुडुंब. ०सार, ०सारपारसार-स्त्री. (व.) संसारोपयोगी सामानसुमान; चीजवस्त. ०सोस-पु. श्वास; ऊर्ध्व. (क्रि०लागणें). [वर+श्वास] वरचा-वि. बाह्य; वरच्या भागाचा. ०चें दूध-न. लहान मुलाला आईच्या दुधाऐवजीं-शिवाय गाईम्हशीचें जें दूध घालतात तें. -टि १.२९७. वरता-तीं-तें-शअ.क्रिवि. सर्व अर्थी वर पहा. १ वर. ' त्यानें जे समयीं वरतें वसावें ते समयीं त्याची बुद्धि मोठी उदार व्हावी. ' -सिंहासनबत्तीशी १. २ आणखी. ३ अधिक. ' त्याहूनि कोटियोजना वरता। '-भारा किष्किंधा ११.७९. ४ हून; पेक्षां. ' तरी स्त्री आणि स्त्रैणावरता। दुःसंग सर्वथा असेना। '-एभा २६.३०२. ५ श्रेष्ठ; उच्चतर. ६ (किनाऱ्याच्या बाजूनें) उत्तरेकडचा. ७ किनाऱ्यापासून आंत. वरला-वरचा पहा. वराबरी-क्रिवि. १ वरचेवर; वारंवार. -तुगा. -शर. २ झपाट्यानें; निमिषांत. वरि-री-शअ.क्रिवि. वर पहा. १ वर; उंच. ' तूं काइसयावरी आहासि ऐसें। पाहिलें मियां। '-ज्ञा ११.२७५. २ आणखी. ' ऐसा जात्यंधु अवस्तु। वरि भवरोगी ग्रस्तु। '-ऋ २. ३ वरवर; बाह्यतः ' सत्य धनंजय कर्मे रूपें दिसतो उगाचि वरि नरसा। '-मोभीष्म ११.७२. ४ पर्यंत. ' तैसें आस्थेच्या महापुरीं। रिघतांति कोटिवरि। '-ज्ञा ७.१३. ' देव जवळ अंतरीं। भेटी नाहीं जन्मवरी। ' -तुगा. ५ (तृतियेचा प्रत्यय)नें; मुळें. ' तो निर्मत्सरू का म्हणिजे। बोलवरी। '-ज्ञा ४.११३. वरिवरी-क्रिवि. वरवर पहा. ' अवघे देखिले अधमरत। वरीवरी आचार दावित। जैसी शांति मैंदाची। '-वरीव-वि. श्रेष्ठ; उत्कृष्ट. ' प्रेमळ देखतांचि दिठीं। मीं घें आपुलिये संवसाठीं। नव्हतां वरीव दे सुखकोटी। नये तरी उठाउठी सेवक होय। '-एभा १४.१५८. वरिवा-पु. १ वरचढपणा; श्रेष्ठपणा. ' जियें आपुलियां वरवां। नंदनवनातें मागती वरिवां। '-शिशु २४९. २ शोभा; उत्कृष्टपणा. वरिष्ठ-ष्ठ-वि. विद्या, वय इ०कांनीं श्रेष्ठ; सर्वांत मोठा; श्रेष्ठ. -ज्ञा १.३०. ' ईश्वर तो अति वरिष्ठ। येरू भूतभौतिक अति कनिष्ठ। '-भारावाल ११. १६५. ३ अत्यंत मोठें, जड. [सं. वरिष्ठ] वरीयान्-वि. श्रेष्ठ (मनुष्य, प्रश्न इ०;) अत्युत्तम; अत्युत्कृष्ट. -पु. (ज्यो.) १८ वा योग. वरील-वि. वरच्या भागासंबंधीं; वरचा. वरुता-तें-शअ. क्रिवि. वर, वरता-तें पहा. ' पाळा मांडिला शरीरावरुता। ' -नव ११.१२०. वरून-शअ. १ वरच्या भागापासून. २ साहाय्यानें; साधनानें; कारणानें. ' तुला म्यां शब्दांवरून ओळखलें. ' ३ परिणामतः; प्रसंगानें; मुळें. ' तूं सांगितल्यावरून मी गेलों. ' ४ पुढून; समोरून; जवळून. ' तो माझे गांवावरून गेला. ' ५ पृष्ठभागास वरून. ६ नंतर; मागाहून. (कालसापेक्ष प्रयोग). 'स्नान केल्यावरून भोजनास वसलों. ' ७ वर; उपरि. ' झाडांवरून पांखरें बसलीं. ' ' घोड्यांवरून सगळीं माणसें बसलीं. ' (फक्त अनेकवचनांत प्रयोग). ८ प्रमाणें. ' आपणांवरून दुसऱ्याला। राखीत जावें। ' -दा १२.१०.२४. ' आपणांवरून जग ओळखावें ' ९ वरील बाजूस; बाह्यप्रदेशीं. ' अंतर्वसन वाह्यवसन कंचुकीवरून प्रावरण। '-ह ३४.१६३. वरौता-ती-वि. वर; वरता पहा. -ज्ञा ४.२०९. ' वरौती एऔनी आनंदभरें। '-दाव १८८. ' सुकुमारपणें भूपति भृंग। धरोनि झेली वरौतें। '-मुआदि १८.३४. वरौनी-वरून पहा. ' वरौनि कापूरकेळीं। भ्रमरांची झांक ऊठिली। ' -शिशु ६०५.

वरई—स्त्री. १ एक प्रकारचें धान्याचें गवत. २ एक धान्य. वरी पहा. [देप्रा. वरइअ]

वरई—स्त्री. एक सुवर्ण नाणें. वराई पहा.

वरकट-ड—वि. इतर; बाकीचे; राहिलेले. ' तरी तपक्लेशा वरकडसनी। दुःख देणार नाहीं बा। -नव ११.२९. [? प्राकृत-पराकड-वराकड-वरकड. -भाअ १८३५]

वरकल, वरकोल—पुस्त्रीन. सोन्याच्या कसोटीचा दगड (हा पितळी कोंदणांत बसविला असतो); कसवटी; कसोटी. ' परी परिसाचा वरकलीं। नाहीं चोखाकिडाची बोली। '-ज्ञा १७. ४०७; ' सोनारी वरकोल घातला। '-रावि १९.११७. [का. ओरेकल्लु; ते. ओरेगल्लु]

वरकस—वि. १ तांदूळ, गहूं, बाजरी, जोंधळा इ० मुख्य धान्यें व तूर, हरभरा, वाटाणा, मूग, मठ हीं कडधान्यें सोडून इतर हलकें, गौण (धान्य). नाचणी, वरी, हरिक वगैरे. २ अशा हलक्या धान्याला योग्य (जमीन); नापीक; माळरानाची. ३ (विशेषतः भातशेताभोवतालची, गवताची (जमीन). वरकसल-स्त्री. वरकस धान्यें, कडधान्यें यांना सामान्य संज्ञा. वरकशी-वि. वरकस धान्याच्या पिकालाच योग्य अशी (जमीन). [वर+सं. कृषु]

**वरकारी**—स्त्री. (बुरूड) दुरडी, सूप यांस गोठ घालण्या- साठीं वापरतात ती जाड कांबीट.

**वरख-ग**—पुन. (कों. कुण.) आडनांव. [सं. वर्ग]

**वरख**—पु. १ पान (पुस्तकाचें). २ पान; पातळ पत्रा; वर्ख. (सोनें किंवा इतर धातूचा). 'कथिल चांदिचे सारखे वरख।' -प्रला १९६. ३ कपटा; अर्धा तुकडा (कागदाचा). 'लिहिले असती वरखावरी।'-दावि. ४ अर्धा वंद; चौवंदी घडी घातलेल्या देशी कागदाचा एकअष्टमांश भाग. [अर. वरक] **वरखी**-वि. १ वरख लावलेलें; सोन्यानें मढविलेलें (पान). २ मुलाम्याची; खोटी. 'ब्रह्म सबाह्याभ्यंतर भरलें परि भक्ति नसो वरखी।'-देप ७३.

**वरखडणें, वरखाडणें, वरखडा, वरखाडा**—ओर- खडणें, ओरखडा इ० पहा.

**वरखणें**—अक्रि. वर्षणें पहा. 'सुरेज्याच्या वारीं वरि सुमन- वर्षे वरखिला।' -निमा १, व्यंकटेश स्तोत्र ३०. [सं. वृष्- वर्ष; हिं. बरसना]

**वरखता-त्या**—पु. वरकत्या-ता पहा. भात कापून काढल्या- वर त्याचे भारे बांधण्यास, पेंढयास पीळ घालून वावभर लांब करतात तो दोर. -कृषि २३८.

**वरखल**—पु. वरकल पहा.

**वरखशी, वरखशील, वरखस, वरखसल**—वरकस इ० पहा.

**वरखु**—स्त्री. वृष्टि. 'पाणियावरी वरखु। होतां कें असे विशेखु।'-अमृ ६.६०. [सं. वृष्-वर्ष]

**वरंग**—पु. एक झाड.

**वरगण**—स्त्री. वांटणी; (प्र.) वर्गणी. 'जयाचिया अक्षौ- हिणी। तेणें तिया आरणी। वरगण कवणकवणी। महारथीया।' -ज्ञा १.२२. **वरगणी, वरगत**-वर्गणी, वर्गत पहा.

**वरगणें**—क्रि. (वे.) वांकडें होणें.

**वरंगल-ळ**—पु. भाताची एक जात. (कु.) वरंगाळ. याच्या तीन पोट जातीः-साधा वरंगल, दुधा वरंगल व शेप्या वरंगल.

**वरंग(घ)ळ**—स्त्री. उतार; उतरण; घसरण. [वरून+गळणें, घळणें?] **वरंग(घ)ळणें, वरग(घ)ळणें**-अक्रि. १ खालीं घस- रणें; ओघळणें. २ कोसळणें; गडगडणें; ढासळणें. ३ धोधो खालीं पडणें (पाण्याचा लोट, नदी). ४ पुष्कळसें खालीं, बाहेर पडणें; भसदिशीं बाहेर येणें, वाहणें. 'कणसांतून दाणा-पोत्यांतून साखर, सरांतून मोतीं-नाकांतून नथ-खिशांतून रुपये वरंगळतो -ती-तें- तात.'

**वरघट-टी**—स्त्री. १ भरभराट; उत्कर्ष. 'धंदा वरघटीला आणणें.' -केसरी २९.९.३०. २ पुनरुज्जीवन. [वर+घटणें]

**वरचणें**—क्रि. (व.) कापूस वठणें.

**वरचस, वरचस्व, वरचस्वता, वरचस्वी**—वर्चस, वर्चस्व व त्यांचे सामासिक शब्द पहा.

**वरचा**—वि. जागीं; ऐवजीं; वांटचा, वारचा पहा.

**वरचा-ता**—वि. पश्चिमेकडचा; पाश्चात्य. वरती पहा.

**वरचेवर, वरच्यावर**—क्रिवि. १ (खालीं न येतां, पडतां) वर; अधांतरीं. २ जसें होतें, असावें तशा स्थितींत; अलगत; हातचे हातीं. ३ वारंवार, पुन्हां पुन्हां. ४ झट्दिशीं; चलाखीनें. [वर द्वि.]

**वरचिलें, वरचील**—वि. १ इतर; अन्य; बाकीचें; उरलेलें; अवांतर. 'जन्मासवें श्रम वरचिलही गेले।' -ज्ञा ९.४०४. २ वरील; वर सांगितलेलें. 'आतां चेवेंसि कवण भिडे। हें पांडवसैन्य कीर थोडें। वरचिले निपाडें। दिसत असे।' -ज्ञा १.११९. ३ आणखी. ४ किरकोळ; सामान्य. 'संसप्तक ते राक्षस अर्जुन तो रघुपती न वरचील।' -मोकर्ण २.१२. वरकड पहा. [वर]

**वरजणें**—उक्रि. वर्जणें पहा. १ टाकणें; त्याग करणें. 'आपल्याला तुम्ही रूपासी समजा। कासया वरजा आरसिया।' -तुगा ३३३३. २ प्रतिबंध करणें. 'नमन करुनिया निघतां न सके माता सुतास वरजाया।' -मोरा १.१२.२६.

**वरजाळी**—स्त्री. भोंवरा खेळण्याची एक पद्धत.

**वरजी वांकडा**—वि. (वरजी आणि वांकडा असे कृष्णाचे दोन विरूप गोपगडी होते त्यावरून) अत्यंत बेडौल; विद्रूप; कुरूप. वडजा वांकडा, वडजा पहा.

**वरट, वरटघाण, वरड, वरडणें, वरडा, नरडा- वरड**—ओरट, ओरटघाण इ० पहा.

**वरंट**—पु. (राजा.) पेटका; वळ; (प्र.) वरवंट.

**वरटा**—स्त्री. १ हंसी. २ गांधील माशी. [सं.]

**वरंटा, वरंटापाटा**—पु. वरवंटा, वरवंटापाटा पहा.

**वरठा-ठी**—पु. (व. कों.) परीट; धोवी. [सं. वरटा= हंसी?] **वरठीण**-स्त्री. धोबीण. 'गाढवीकरितां रडतां वर- ठिणी।' -दावि १८५.

**वरठी**—स्त्री. हंसी; वरटा. 'निर्मळ वरठी गे। तयाचे दारीं मी घाली घरटी गे।' -मध्व ३९८. [सं. वरटा]

**वरंड**—स्त्री. १ डोक्यावर घेण्याकरितां बांधलेला गवताचा भारा. २ धान्याची रास. ३ कापणी केलेल्या ताटांचा भारा. ०गवत-न. कापून आणलेल्या ताटांचा भारा. असा भारा दर- साल कुळाकडून मिळण्याचा खोतास हक्क असतो. [सं. वरंड]

**वरंड-डा-डी, वरांडा**—स्त्रीपु. १ कठड्याची, कडेची भिंत (रस्ता, व्हरांडा याची). २ दोन शेतांमधील बांध; हद्दीची भिंत; पाळा. ३ ज्याच्या भेंडा पाडतात ती मळलेली माती (तिच्या लांबट ढिगाच्या आकारावरून). ४ भिंतीची मुंढेरी; वरवंड. ५ छप्पराचें आढें; पाटेस. [सं. वरंड] **वरंडा**-पु. (कु. कों.) दगडांची अव्यवस्थित रास.

**वरंडा**—पु. सज्जा; छप्पर असलेली गॅलरी. [ सं. वरंड; गो. वरांद; पोर्तु. वरंदा; इ. व्हरांडा ]

**वरंडा**—पु. ( गो. ) उच्च कार्यासाठीं देह ठेवणाऱ्या थोर पुरुषाच्या मृत्युस्थानीं असलेलें दगडांच्या ढिगाचें स्मारक. -सह्याद्री १६०.

**वरडे( ढे )ल**—न. तळणाचें शिल्लक राहिलेलें तेल. याचा वास फार उग्र असतो. ओरडेल पहा.

**वरढाण**—स्त्री. दुर्गंध; कुदर्प. ओरढाण पहा. ' झाली विष्टेची सारणी । भोंवतीं उठली वरढाणी । ' -दा ३.३.२३.

**वरढोक-ढोंक**—पु. भातखाचरांतील एक मोठा पक्षी.

**वरण**—पु. क्षत; व्रण पहा.

**वरण**—स्त्री. ( कों. ) गवताचा भारा. वरंड पहा.

**वरण**—न. १ डाळीचें कालवण. याचे-दोन प्रकारः आंबट व गोड. २ शिजविलेली डाळ पांतळ करून भातावर वाढतात तें. वरान्न पहा. [ सं. वर+अन्न ] म्ह० वरण दाटणी आणि बायको आटणी. ०भात-पु. १ नुसतें वरण आणि भात; साधें जेवण. २ (ल.) नवऱ्यापेक्षां बायको वय, उंची, बांधा इ० त मोठी असते तें जोडपें. ' आतां अंमळ मुलगा आहे बसक्या बांध्याचा आणि पोरीची जात पडली उफाड्याची म्हणून वरणभात व्हावयाची भीति ! ' -गडकरी ( वेड्यांचा बाजार ).

**वरण**—न. १ लग्न; विवाह. ' पट्ट महिषीचें वरण । भौमासुराचें निर्दळण । ' -एभा ३१.३८३. २ नेमणूक; निवड; पसंती. [ सं. वृ-वरण ] **वरणी**-स्त्री. १ वधूवस्त्र; अष्टपुत्री. ' ती पिंवळी वरणी नेसली होती. ' -ज्ञांमू ८१. २ पाळीनें अनेक ब्राह्मणांनीं करावयाचें अनुष्ठान, देवाची आराधना. ( क्रि० देणें; घेणें ). ३ अशा अनुष्ठानाची पाळी, वेळ ( दर एकाची ). ४ (दैवज्ञ) वरातीच्या वेळीं लागणारें-पांच नारळ, साडी व खण-इ० सामान. ५ ( दैवज्ञ ) तेलफळाच्या वेळचें सामान ( नारळ, खारका, खजूर, बदाम इ० ). -वदलापूर २३६, २४०. ०**लावणें**-१ सोय लावणें; पाळी देणें. २ प्राप्तीचें साधन मिळवून देणें. **वरणीय**-वि. वरावयाचा; निवडावयाचा; वरण्यास लायक, योग्य. **वरणें**-उक्रि. १ लग्न लावणें; विवाह करणें. ' बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें । ' -ज्ञा ६.४५३. २ नेमणें; अधिकृत करणें. ३ पसंत करणें; स्वीकारणें. -ज्ञा ९.३१०. ' कीं टाकावें सत्वर वपु निजरण धर्म सत्पथा वरुनी । ' -मोभीष्म ११.१०९. ४ धारण करणें; घेणें. -माज्ञा १७.५८. ५ अंगिकारणें; घेणें; स्वीकार करणें. ' पांडवभयें पलायन धरिलें असतां रणीं अनीकांहीं । ' -मोकर्ण १.२३.

**वरणा**—पु. पावटा; कडवेवाल. [ वरण ? ]

**वरणें**—वैरणें पहा.

**वरणें**—न. ( व. ) वैरण पहा.

**वरतनी**—स्त्री. ( बे. ) रतीब. [ सं. वृत्त, वर्तन ]

**वरतबळा,वरतावळा,वरताळा**—पु. १ एका शिक्क्याचें नाणें देऊन दुसऱ्या शिक्क्याचें घेतांना पडणारा वटाव, वरवट्टा; वर्तावळा. २ विवक्षित प्रमाणानें मोजल्यावर येणारा वाढावा. ३ व्यवहार केल्यानंतर हातीं राहणारा नफा किंवा भरावा लागणारा तोटा; शिल्लक; बाकी. ४ पुरें माप दिल्यावर वर आणखी थोडा जिन्नस घालतात तो. [ वर, वरता+ळ ]

**वरताणा**—पु. ( सोनारी ) सोनाराचें एक हत्यार; काकणता पहा. यानें दागिन्याला गोल आकार देतात. [ सं. वर्तन ]

**वरतावा**—पु. हल्ला; चढाई. -शर.

**वरती, वरतीकडे**—क्रिवि. पश्चिमेस. वरचा-ता पहा. देशावरचा माणूस कोंकणच्या बाजूस वरती म्हणतो. याच्या उलट खालती-कडे.

**वरत्रा**—स्त्री. दोरी; कातड्याची वादी, पट्टा. [ सं. ]

**वरदळ**—स्त्री. १ (रस्ता, जमीन, वस्त्र-पात्र इ० वर) नासधुशीची क्रिया; धुडगूस; तुडवातुडव; जोरानें, निष्काळजीपणें वापर; रावता. २ त्रास देणें; छळणें. ' पोरांनीं वरदळ लावली. ' ३ उपसर्ग; अडचण; त्रास. ' आमची कांहीं वरदळ लागावयाची नाहीं. ' [ सं. वर+दल् ] **वरदळणें**-अक्रि. तोंड सोडणें; बाचाबाची करणें; भांडणें, तंडणें. -सक्रि. तुडविणें; नास करणें. **वरदळीस-वर येणें**-हमरीतुमरीवर येणें; फार कडाक्यानें भांडणें.

**वरदाव**—स्त्री. वरदळ पहा.

**वरदावरद-दी**—स्त्री. वरावर्द, वर्दावर्द पहा.

**वरदी**—स्त्री. वर्दी पहा. ' शाहू राजाशीं वरदी कळली । ' -पाळणेसंग्रह ६.

**वरदोळणें**—उक्रि.(महानु.) रगडणें; वरदळणें पहा. ' चाणोरे वरदोळि मुष्टिक । ' -गस्तो ८०.

**वरधणी**—पुन. ( राजा. ) शिजणाऱ्या पदार्थावर ठेवलेलें झांकण. [ सं. वर्धनी=विशिष्ट भांडें ]

**वरंधार**—क्रिवि. ( कर्ना. ) मुसळधार; एकसारखा. ( पडणारा पाऊस ) [ वर+धार ]

**वरधाविणें**—उक्रि. खुष करणें; खुलविणें; आंजारणें गोंजारणें. [ सं. वृध्-वर्ध ]

**वरन्**—स्त्री. ( प्र. ) वैरण. ( व. ) ल्हानसर ओल्या ज्वारीच्या ताटांचा ( जनावरास दिलेला ) चारा.

**वरप**—ओरप पहा. **वरपणें**-उक्रि. १ ओरपणें पहा. २ म्हशीच्या निरणांत हात घालून तिला फळण्यास उद्युक्त करणें. ३ (सारवण, सांडलेला द्रव पदार्थ इ० ) हातानें निपटणें. ४ भुरकणें. 'मुखापासीं नेतो गजवर पितो तें वरपितो ।'-र (गजेंद्रमोक्ष).

**वरपट बकरा** —पु. ( माण. ) खच्ची केलेला बकरा. [ वरपणें+बकरा ? ]

**वरपट्टी**—स्त्री. (विणकाम) मागावरील कापड गुंडाळावयाच्या लांकडास घालावयाची खीळ. या दोन असतात. फिरवणी पहा.

**वरपड-डा, वरिपडा**—वि. १प्राप्त.-ज्ञा६.१६८;'पांडवां वरपड न व्हावें।' -मुवन १२.४७. २ स्वाधीन; वश. -ज्ञा २. ३४९. 'वरपडा होसि तूं काळा।' -देप ७१. ३ आसक्त; ताबेदार; वश. 'जैसा योगी होय आत्मज्ञाना। वरपडा पै।' -कथा ४.६.११२. ४ व्याप्त; मग्न. 'दुःखा वरपडा होता जाला।' -दा ३.१.४८.५ विव्हल; दुःखी. 'तै वरपडा होय अरण्यशोकें।' -मुसभा ८.१६३.-कथासा ३२.११४.६ पात्र; योग्य.'म्हणोनि स्वधर्मु हा सांडसील। तरी पापा वरपडा होसील।' -ज्ञा २.२०१. **वरिपडणें**-अक्रि. १ प्राप्त होणें. 'तेथ शब्दांकुर वरिपडी। श्रोत्रावाढी वेल्हडी।' -ज्ञा १५.१००. २ गुंतणें; वरपडा होणें. 'वरिपडलें भवपाशें।' -दावि ८४. ३ गोंधळणें; कांहीं कळेनासें होणें. ४ बुडणें; मग्न होणें. 'सेवटी होए तापा वरिपडे। दुःखाग्निमाजि।' -ऋ ५४. **वरिपडी**-स्त्री. १ मिठी.-एभा ६.५७. २ उडी; झडप; लुब्ध होणें. 'ऐशी डोळयां आवडी। म्हणोनि कामिनी वरिपडी।' -एभा १.२९४. ३ गर्दी. 'ब्रह्मादिकांचिया वरिपडी। वखलुनि कवणाचे तांट काढी।' -भाए १३२. ४ (महानु.) पूर्वपद; आश्रयस्थान. 'तया सन्निधानाची वेडी। जया नव्हेचि वरपडी।' -भाए ५०. [? वर+पडणें]

**वरपत्र**—न. (जप्तीचा) सरकारी हुकूम; वारंट. 'मी तों महाराजाचा देशी जफ्तीदार। धाडिलेति वरपत्रासह।' -दावि ३७७. [वर=श्रेष्ठ+पत्र ?]

**वरपा**—पु. दरोडा; लुटीचा हल्ला. 'ठकु सितरु वरपेकरी। वरपा घालिती।' -दा ३.७.४९. **वरपेकरी**-पु. लुटारू; दरोडेखोर. 'मारेकरी वरपेकरी। दरवडेकरी खाणोरी।' -दा २.३. ३१.

**वरबडणें, वरवडा, वरवाडणें, वरबाडा**—ओरबडणें, ओरबडा इ० पहा.

**वरंबा, वरंभा, वरभा**—पु. १ बांध (वाफा, पाट, धरण इ० ला घालतात तो). (क्रि० घालणें). 'तों पाचेच्या वाफ्यांचे वरंबे नवेच बांधले होते... ते त्यानेंच तुडवून टाकिले.' -बाळ २.३७. २ पाण्याचा पाट. 'वरंबा खोल आहे. त्यांत पाणी अडकलें.' ३ टेंगूळ. ४ वरंडी पहा.

**वरम**—स्त्री. (व.) १ शेत पेरल्यानंतर शेतांत उठणाऱ्या मातीच्या उंच रांगा. २ पाणी जाण्यासाठीं बागाइतींत केलेल्या मातीच्या वरंड्या.

**वरमणें**—अक्रि. १ नाजुक भागाला धक्का लागणें. (ल.) अंतःकरणाला झोंबलेला असणें; खोंचला जाणें; मर्मभेद पावणें. २ वर्मे काढल्यामुळें ओशाळणें; शरमणें. 'कृष्णेच्या देव रमे स्मरतां विस्मय रमा मना दे वरमे।' -मोकृष्ण २९.६१. ३ खिन्न होणें. 'सर्व बलासह कीशवरा प्रभुच्या अनुजाहि रणीं वरमाया।' -मो रामायणें १.२८७. [सं. मर्म] म्ह० नाक खाजविलें नकटें वरमतें.

**वरमणें**—अक्रि. दबलें जाणें; बसणें (गळूं, ठुसठुस, धडधड इ०). [विराम ?]

**वरयिता-यतु**—वि. वरणारा (नवरा); भर्ता. 'इया लागीं इये वरयितु हा।' -ज्ञा १३.१०२४. [सं. वरयितृ-ता]

**वरयी**—स्त्री. वरी, वरई पहा.

**वरला(ले कडे-कडून**—क्रिवि. पश्चिमेकडे; वरती-कडे. 'वरिलेकडून मंदानिळ। लोटोनि आणी दिव्य परिमळ।' -मुआदि २३.३.

**वरलाशीं**—न.अव. (सांकेतिक) ख्रीस्तन. (ए. व.) वरलासें. [वरील]

**वरली**—स्त्री. (गो.) तांदूळ धुण्याची (वांतुची) रोवळी.

**वरलें**—न. (कु.) १ राख सांठविण्यासाठीं भिंत घालून केलेली खोलगट जागा. २ जमीन वाहून जाऊं नये म्हणून घातलेला चौरस बांध. ३ दोन गांवांमधील सीमेची खुण.

**वरव**—स्त्री. १ एखाद्या पदार्थाचें वैपुल्य असल्यामुळें वारंवार तोच खर्चण्याचा, वापरण्याचा प्रकार (तांदुळ, इतर धान्य, भाजी इ० बाबत). 'जं जें धान्य पिकतें त्याची कांहीं दिवस वरव असती.' 'सजगुऱ्याची वरव पुरवठ्याची नव्हे.' २ तांदूळ, पीठ इ० मुख्य पदार्थास भाजी, कालवण इ० च्या साहाय्यामुळें किंवा कांहीं कारणानें येणारी ऊर; शिल्लक. 'फणसाचे भाजीनें अन्नास वरव येती.' ३ सारखा वापर, सेवन, खर्च. 'लोभें आशींचीचि न मणिराशींची वरी वरव राया।' -मोसभा ६.४४. ४ पुरवठा; सांठा; संग्रह. 'वर्षाची वरव केली नाहीं म्हणून तांदुळाचा तोटा आला.' ५ रेलचेल; समृद्धि. 'वरव घरामधें ढेकूण पिसा कुठवर देऊं मी धिरा।' -पला ८३. ६ तृप्ति; पुरवठ्यामुळें समाधानाची स्थिति. [वर किंवा उरणें, उरविणें ;तुल० सं. उर्वरित]

**वरवंट**—पु. १ साडी नेसण्याचा एक प्रकार. परवंटा पहा. २ वरवंटा पहा. **वरवंटयाचें नेसणें**-न. वरवंट अर्थ १ पहा.

**वरवंट-टा**—वि. सुंदर; शुद्ध. वरवंटा पहा.सुंदर स्त्री. 'ऐसा शिंगार करूनि गोमटा। जात्या झाल्या त्या वरवंटा।' -नव १४. ९१७. [सं. वर+वर्त]

**वरवंटा-ट**—पु. चटणी, औषधें इ० पदार्थ पाट्यावर वांटण्यासाठीं केलेला उभट वर्तुळाकार घडीव दगड. २ मोटेच्या विहिरीवरचें वरील आकाराचें बांधकाम. ३ (वरवंट) पेटका; बळ;

